**राष्ट्रीय शैक्षणिक धोरण, २०२० अंतर्गत (१)एकीय/समूह विद्यापीठ किंवा पदवी देणारी स्वायत्त महाविद्यालय स्थापन करणे, (२) राष्ट्रीय शैक्षणिक धोरण २०२० चे तत्त्व लागू करण्यासाठी आवश्यक असणाऱ्या परिवर्तन संसाधनांसह सर्व उच्च शैक्षणिक संस्थांचे नवीन संशोधन/ अध्यापन/ स्वायत्त महाविद्यालयांमध्ये पुन्हा वर्गीकरण करण्यासाठी तपशीलवार योजना आणि रोडमॅप तयार करणे, (३) राज्यातील शैक्षणिक संस्थांना ५० वर्ष पुर्ण झाली आहेत, अशा संस्थांना विद्यापीठाचा दर्जा देणे, (४) अध्यापन-अध्ययनासाठी शैक्षणिक उत्कृष्टता केंद्र स्थापन करणे यासंदर्भात समिती स्थापन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: एनईपी-२०२२/प्र.क्र.१०६/विशि-३,**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांकः- २६ एप्रिल, २०२२

**संदर्भः**- शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. संकीर्ण-२०२०/ प्र.क्र.१७६/विशि-३,

दि.१६.१०.२०२०

**प्रस्तावनाः-**

मानव संसाधन विकास मंत्रालय, भारत सरकार यांनी राष्ट्रीय शैक्षणिक धोरण-२०२० लागू केलेले आहे. त्यामुळे राष्ट्रीय शैक्षणिक धोरण-२०२० ची राज्यात अंमलबजावणी करण्याच्यादृष्टीने या धोरणाचा अभ्यास करुन राज्य शासनास अहवाल सादर करण्यासाठी संदर्भाधीन दिनांक १६ ऑक्टोबर, २०२० च्या शासन निर्णयानुसार डॉ.रघुनाथ माशेलकर, माजी महासंचालक, वैज्ञानिक आणि औद्योगिक संशोधन परिषद, नवी दिल्ली यांच्या अध्यक्षतेखाली कार्यबल गट स्थापन करण्यात आला. सदर समितीने आपला अहवाल शासनास दि.३० जून, २०२१ रोजी सादर केला आहे. सदर धोरणाची राज्यात अंमलबजावणी सुलभ करण्यासाठी, अहवालातील शिफारशींचे, त्यांची निकड, प्रभाव, अंमलबजावणीची सुलभता, गुंतवणूक आणि निधीची गरज, कार्यवाहीमधील प्राधान्य या घटकांचा विचार करुन तीन टप्प्यात खालीलप्रमाणे वर्गीकरण करण्यात आले आहेः

(१) तातडीने हाती घ्यावयाचा/किमान संसाधनांची आवश्यकता असलेला कार्यक्रम;

(२) मध्यम मुदतीचा/मध्यम संसाधनांची आवश्यकता असलेला कार्यक्रम;

(३) दीर्घकालीन/ज्यासाठी मोठ्या प्रमाणावर निधीची आवश्यकता असलेले कार्यक्रम.

राष्ट्रीय शैक्षणिक धोरण, २०२० च्या धोरणाची राज्यात अंमलबजावणी करण्याच्या अनुषंगाने सदर शिफारशी व त्यावर शासनाने करावयाची कार्यवाही याबाबतच्या प्रस्तावास दिनांक २७ जानेवारी, २०२२ रोजीच्या मंत्रीमडंळाच्या बैठकीत मान्यता देण्यात आली. त्यास अनुसरुन समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

डॉ. माशेलकर समितीच्या शिफारशीस अनुसरुन, विभागाने प्रस्तावित केलेल्या कार्यवाहीस मंत्रिमंडळाच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार, (१) एकीय/समूह विद्यापीठ किंवा पदवी देणारी स्वायत्त महाविद्यालय स्थापन करणे, (२) राष्ट्रीय शैक्षणिक धोरण २०२० चे तत्त्व लागू करण्यासाठी आवश्यक असणाऱ्या परिवर्तन संसाधनांसह सर्व उच्च शैक्षणिक संस्थांचे नवीन संशोधन/ अध्यापन/ स्वायत्त महाविद्यालयांमध्ये पुन्हा वर्गीकरण करण्यासाठी तपशीलवार योजना आणि रोडमॅप तयार करणे, (३) राज्यातील शैक्षणिक संस्थांना ५० वर्ष पुर्ण झाली आहेत, अशा संस्थांना विद्यापीठाचा दर्जा देणे, (४) अध्यापन-अध्ययनासाठी शैक्षणिक उत्कृष्टता केंद्र स्थापन करणे यासंदर्भात खालीलप्रमाणे समिती स्थापन करण्यात येत आहेः-

| अ.क्र. | मान्यवरांचे नाव | समितीतील पदनाम |
|---|---|---|
| १. | डॉ उज्वला चक्रदेव, कुलगुरु, श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठ, मुंबई. | अध्यक्ष |
| २. | डॉ.उध्दव भोसले, कुलगुरु, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड | सदस्य |
| ३. | डॉ. डी. टी शिर्के, कुलगुरु, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर | सदस्य |
| ४. | डॉ.सुभाष चौधरी, कुलगुरु, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर | सदस्य |
| ५. | प्रा.डॉ.प्रशांत बोकारे, कुलगुरु, गोंडवाना विद्यापीठ, गडचिरोली | सदस्य |
| ६. | डॉ.के.सी.मोहिते, प्राचार्य, सी.टी. बोरा कॉलेज, शिरुर, जि. पुणे | सदस्य |
| ७. | डॉ.ॲन्सी जोस, सेवानिवृत्त प्राध्यापक, तथा संचालक एम के ई सोसायटीचे नागीनदास खंडेलवाला कॉलेज, मुंबई. | सदस्य |
| ८. | डॉ.तुकाराम शिवारे, (माजी प्राचार्य) संचालक, विल्सन कॉलेज, मुंबई | सदस्य |
| ९. | डॉ.श्रीमती परवीन सय्यद, वरिष्ठ कायदा अधिकारी, सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे. | सदस्य |
| १०. | डॉ.विजय जोशी, वरिष्ठ सल्लागार, राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान (रुसा), मुंबई | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ११. | श्री. वैभव थोरात, सिनेट सदस्य, मुंबई विद्यापीठ, मुंबई | सदस्य |
| १२. | कुलसचिव, सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे. | सदस्य-सचिव |

२. सदर समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे असेल:-

(१) सदर समिती उच्च शिक्षण संस्थांचे एकीय/समूह विद्यापीठ, पदवी प्रदान करणाऱ्या बहुविद्याशाखीय स्वायत्त संस्थांमध्ये रुपांतरीत करण्यासाठी आवश्यक पात्रता, निकषांचा आराखडा मार्गदर्शक तत्वांसह तयार करेल.

(२) सदर समिती उच्च शिक्षण संस्थांचे संशोधनाधिष्ठित विद्यापीठांमध्ये आणि अध्यापनाधिष्ठित विद्यापीठांमध्ये रुपांतर होण्यासाठी मानांकनाची पध्दती, क्रमवारीता पध्दती काय असावी यासाठीची यंत्रणा तयार करेल.

(३) राज्यातील ज्या शैक्षणिक संस्था/महाविद्यालयांना ५० वर्ष पूर्ण झाली आहेत अशा महाविद्यालयांना विद्यापीठाचा दर्जा बहाल करण्यासाठी निकष नियमावली/ मानके व मापदंड/ पात्रतेचे निकष निश्चित करण्यासाठी सदरची समिती आराखडा तयार करेल. या आराखडयात शैक्षणिक उत्कृष्टता, प्रशासकीय अनुभव आणि प्रशासन क्षमता, आर्थिक सक्षमता, विद्यार्थी नोंदणी, मानांकनाचा इतिहास, पदवी, पदव्युत्तर पदवी, पीएच.डी. पदवी इ.अभ्यासक्रम, नामवंत माजी विद्यार्थ्यांचा महाविद्यालयाविषयीचा दृष्टीकोन, नोकरी व्यवसाय मार्गदर्शन केंद्राची प्रगती, महाविद्यालयाविषयी उच्चस्तरीय निरीक्षणे व दृष्टीकोन, शिक्षकांची गुणवत्ता किंवा गुणवत्ताधारक शिक्षक, पदवीचा निकाल, महाविद्यालयाचे उद्दिष्टे व भविष्यकालीन योजना, विभागाच्या योजना इ. मानकांचा समावेश असेल.

(४) विद्यार्थ्यांच्या सर्वांगीण विकासासाठी उच्च शिक्षण संस्थांनी पूर्ण प्रवेश, समानता, समावेशन, उच्च प्रतीचे अध्यायन व अध्यापन, सर्वांपर्यंत शिक्षण आणि क्षमता निर्मिती मूल्यांची सुनिश्चिती करुन विद्यार्थ्यांना बहुविद्याशाखीय आणि उच्च दर्जाचे शिक्षण देण्याबाबतची शिफारस समिती करेल.

(५) यामध्ये मल्टीपल एन्ट्री-एक्झिट व श्रेयांक हस्तांतर (क्रेडिट्स ट्रान्सफर) संदर्भात शैक्षणिक संरचना काय असेल याबाबत शिफारस करेल.

(६) सदर समिती बहुविद्याशाखीय विद्याशाखा, समूह आणि ज्ञान स्त्रोत केंद्र विकसित करण्याचा आराखडा तयार करेल. श्रेणीबध्द मानांकन, श्रेणीबध्द स्वायत्तता, संलग्निकरण रद्द करण्याची प्रक्रिया, याबाबत मार्गदर्शक तत्त्वे तयार करेल.

(७) सदर समिती खुले दूरस्थ शिक्षण आणि ऑनलाईन कार्यक्रमासाठीच्या नियमांची शिफारस करेल.

(८) राज्यातील शैक्षणिक संस्थांच्या अधिकार क्षेत्राचा समिती पुनर्विचार करेल.

(९) अध्यापन-अध्ययनासाठी शैक्षणिक उत्कृष्टता केंद्र स्थापनेसाठी योजना तयार करेल, ज्यामध्ये प्रगत अध्यापन पध्दती, तंत्रज्ञानाचा वापर, अभ्यासक्रम विकास आणि विविध विषयातील ज्ञानाचे एकत्रीकरण करणे या बाबी समाविष्ट असतील.

(१०) उपरोक्त बदल करण्यासाठी महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ व इतर अधिनियमांमध्ये काय सुधारणा कराव्या लागतील याबाबत शासनास शिफारस करेल.

(११) तसेच यासंदर्भात विद्यापीठ अनुदान आयोगाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनांचा विचार करुन शासनास शिफारस करेल.

(१२) डॉ. माशेलकर समितीच्या अहवालातील उपरोक्त मुद्द्यांशी संबंधित शिफारशींचाही सदर समिती विचार करुन मार्गदर्शक सूचना निश्चित करेल.

३. सदर समितीने आपला अहवाल शासनास तीन महिन्यांत सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२२०४२६१७३१५७०७०८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PRAVINKUMAR GULABRAO PAWAR

Digitally signed by PRAVINKUMAR GULABRAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL, 2.5.4.20=5d2dad0f66e8336730e2b666877a365c20f60db099de815eecadde01ca77f148, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8F18625ADB482A7EE2512CEA93CE697388C95A99C89E41E85C05A3DE8476488F, cn=PRAVINKUMAR GULABRAO PAWAR
Date: 2022.04.26 17:33:35 +05'30'

**( प्रविणकुमार पवार )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

(१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई,

(२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ,

(३) मा. उपमुख्यमंत्री यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई ,

(४) मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

(५) मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

(६) डॉ. उज्वला चक्रदेव, कुलगुरु, श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठ, मुंबई,

(७) डॉ. उध्दव भोसले, कुलगुरु, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड,

(८) डॉ. डी. टी. शिर्के, कुलगुरु, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर,

(९) डॉ. सुभाष चौधरी, कुलगुरु, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर,

(१०) प्रा.डॉ. प्रशांत बोकारे, कुलगुरु, गोंडवाना विद्यापीठ, गडचिरोली,

(११) डॉ. के.सी.मोहिते, प्राचार्य, सी.टी. बोरा कॉलेज, शिरुर, जि. पुणे,

(१२) डॉ. ॲन्सी जोस, सेवानिवृत्त प्राध्यापक, तथा संचालक, एम. के. ई. सोसायटीचे नागीनदास खंडेलवाला कॉलेज, मुंबई,

(१३) डॉ. तुकाराम शिवारे, (माजी प्राचार्य) संचालक, विल्सन कॉलेज, मुंबई,

(१४) डॉ. श्रीमती परवीन सय्यद, वरिष्ठ कायदा अधिकारी, सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे,

(१५) डॉ. विजय जोशी, वरिष्ठ सल्लागार, राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान (रुसा), मुंबई,

(१६) श्री. वैभव थोरात, सिनेट सदस्य, मुंबई विद्यापीठ, मुंबई,

(१७) कुलसचिव, सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे,

(१८) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई

(१९) उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई

(२०) निवडनस्ती (विशि-३).